**मजूर सहकारी संस्थांना देण्यात आलेल्या सवलतीत वाढ करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग,
शासन निर्णय, क्रमांक-एलएबी-१०९८/प्र.क्र.१६४/इमारती-२,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- ११ जानेवारी, २०००

वाचा:- १) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम व गृहनिर्माण विभाग क्र.एलसीएस -१०७७ /५५९३३/का.२७, दि. ३० मार्च १९७९.

२) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.एलसीएस-१०८३/८४७१४/७९८/ मि.व्य.-३, दि. ५-१२-१९८४

**प्रस्तावना:-**

मजूर सहकारी संस्थांना सार्वजनिक बांधकाम विभाग व पाटबंधारे विभाग, यातील बांधकामाबाबत देण्यात आलेल्या सवलतीबाबतचे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाकडील शासन निर्णय क्र.एलसीएस-१०८३/८४७१४/७९८/मि.व्य.३, दिनांक ५ डिसेंबर १९८४ अन्वये देण्यात आले आहेत. यामधील सवलतीमध्ये वाढ करण्याबाबतचा प्रश्न काही काळ शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत आता मजूर सहकारी संस्थांना कामे देण्याबाबतच्या सवलतीत खाली निर्देशित केल्याप्रमाणे वाढ करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

१) **कामे देण्याची मर्यादा -**

(अ) रुपये ५ लक्ष किंमतीपावेतोची कामे मजूर सहकारी संस्थांना निविदा न मागविता कृषि व सहकार विभागाने विहित केलेल्या पध्दतीनुसार देण्यात यावीत.

(ब) कामे देण्यासाठी मजूर सहकारी संस्थांची सुधारित वर्गवारी पुढीलप्रमाणे राहील-

"क" वर्गातील नोंदणीकृत सर्व संस्थांना "ब" वर्गामध्ये दर्जावाढ देण्यात यावी.
"ब" वर्ग उच्चतम पात्रता रु.१,००,०००/- ऐवजी रु.२,५०,०००/-(अडीच लाख)
"अ" वर्ग उच्चतम पात्रता रु.२,००,०००/- ऐवजी रु.५,००,०००/-(पाच लाख)

२) **निविदामध्ये अधिमान देणे -** पूर्वी देण्यात येत असलेली निविदामध्ये अधिमान देण्याची तरतूद आता रद्द करण्यात येत आहे.

३) **विद्युत व यांत्रिकी कामे -**

(अ) विद्युत व यांत्रिकी मजूर संस्थांना आता रु.१०,०००/- ऐवजी रु.२५,०००/- पर्यन्तची कामे देण्यात यावीत.

(ब) ज्या विद्युत आणि यांत्रिकी मजूर सहकारी संस्थेचे कार्य २ वर्षाच्या अनुभवानंतर समाधानकारक आढळून येईल अशा संस्थांना निविदा न बोलविता कामे देण्याची मर्यादा रु.२५,०००/- ऐवजी रु.५०,०००/- पर्यन्त वाढविण्यात येत आहे.

४) सवलतींमध्ये वरीलप्रमाणे केलेल्या वाढी लक्षात घेऊन दिनांक ५ डिसेंबर १९८४ च्या शासन निर्णयातील परिच्छेद २ मधील इतर तरतुदीमध्ये खालील प्रमाणे बदल करण्यात येत आहे.

**परिच्छेद-३** मधील (बयाणा रक्कम) रु.२,००,०००/- **ऐवजी रु.५,००,०००/-** वाचावे.
**परिच्छेद-४** (अ) मधील (सुरक्षा अनामत) रु.२,००,०००/- ऐवजी रु.५,००,०००/- वाचावे.
**परिच्छेद-५** (पतदारी प्रमाणपत्र) रु.२,००,०००/- **ऐवजी रु.५,००,०००/-** वाचावे.
**परिच्छेद-६** (६) मधील (कामाचे वाटप) "क" वर्ग ऐवजी "ब" वर्ग वाचावे व रु.५०,०००/- ऐवजी रु.२,५०,०००/- आणि रु.१,००,०००/- **ऐवजी रु.** ५,००,०००/- असे वाचावे.
**परिच्छेद-१०** मधील (कामाचे भाग पाडणे) रु.२,००,०००/- ऐवजी रु.५,००,०००/- वाचावे.

५. एकूण उपलब्ध कामापैकी कामाचे स्वरुप, त्यास आवश्यक असलेली यंत्र सामुग्री, मनुष्य बळ, बांधकाम साहित्य या आधारे कामाचे वाटप मंजूर सहकारी संस्था व सुशिक्षित बेरोजगार अभियंते या दोन्ही संवर्गास करावे व असे करताना दोन्ही संवर्गास ५० टक्के कामे मिळतील याची कटाक्षाने दक्षता कार्यकारी अभियंत्यांनी घ्यावी.

६. मजूर सहकारी संस्थाना वर्षभरात एकूण रु.३० लाख मर्यादेपर्यन्त कामे घेता येतील. कार्यकारी अभियंता यांनी मजूर सहकारी संस्थेस कामाचे कार्यादेश देणेपुर्वी संबंधित मजूर सहकारी संस्थेच्या पासबुकात नोंद घ्यावी आणि त्या संस्थेच्या पासबुकातील नोंदी तपासून एका वर्षात एकूण रु.३० लाखापेक्षा जास्त रकमेची कामे दिली जाणार नाहीत याची दक्षता घ्यावी.

हे आदेश पाटबंधारे विभाग, सहकार व वस्त्रोद्योग विभाग यांच्या सहमतीने अनुक्रमे ७/मोप्र(प्र) दि.९.२.९९ व क्रमांक-२६१, दि.१९.१.९९ आणि वित्त विभागाच्या क्रमांक-१३८/व्यय-६, दि.१०.३.९९ च्या अनौपचारिक संदर्भान्वये दिलेल्या सहमतीने काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( शि.वि.तामखडे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
कृषि व सहकार विभाग, मंत्रालय, मुंबई,
पाटबंधारे विभाग
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
नगर विकास विभाग,
सा.बां.विभागातील / पाटबंधारे विभागातील सर्व मुख्य अभियंते / अधिक्षक अभियंते / कार्यकारी अभियंते,
महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महालेखापाल-२, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सहनिबंधक, मुंबई / पुणे / नागपूर / औरंगाबाद / नाशिक / अमरावती,
अधीक्षक अभियंता, मजूर सहकारी संस्थाद्वारा:- सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, पुणे,
सर्व जिल्ह्याचे उपनिबंधक सहकारी संस्था,
सार्वजनिक बांधकाम विभाग/पाटबंधारे विभाग, यातील सर्व अधिकारी व कार्यासने.

------oo-------